**नार पार औरंगा अंबिका खो-यातील उपसा जोड योजनेच्या सर्वेक्षण व अन्वेषणाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** प्रशामा २०१४/(२५८/२०१४)/जसंअ
मंत्रालय मुंबई-४०० ०३२
तारीख: २३/१२/२०१४

**संदर्भ -**

१) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव, यांचे क्रमांक तापाविम/प्रशा९/५९६७१/२०१४ दिनांक २०/१२/२०१४ चे पत्र.

**प्रस्तावना -**

नार, पार, औरंगा, अंबिका या ४ खो-यातील पश्चिम वाहिनी नदयांचे पाणी पुर्वेकडे तापी खो-यात वळविण्यासाठी तयार करण्यात आलेली उपसा जोड योजना पूर्व व्यवहार्यता अहवालानुसार सफल होत आहे असे निष्कर्ष मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांनी काढले आहेत. पूर्व व्यवहार्यता अहवालानुसार या योजनेचे लाभव्यय गुणोत्तर १.७३ इतके येते. सदर योजनेमुळे सुमारे ९५७६० हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ मिळू शकतो तसेच १४६.२४ दलघमी पाणी बिगर सिंचन प्रयोजनास उपलब्ध होऊ शकते. या योजने अंतर्गत २२ धरणे बांधण्याचे प्रस्तावीत असून, ती एकमेकांशी बोगदयाव्दारे/कालव्याद्वारे/पाईपलाईनव्दारे जोडण्यात येणार असून ५४९ दलघमी पाणी उपसा पध्दतीने उचलून प्रस्तावित मांजरपाडा-२ वळण योजनेद्वारे खोरे दुभाजक रेषेच्या पलीकडे तापी खो-यातील गिरणा उपखोऱ्यात वळविण्याचे प्रस्तावित आहे. सदर योजनेचे सविस्तर सर्वेक्षण व अन्वेषण करुन सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याचा प्रस्ताव तापी खोरे विकास महामंडळाने सादर केला होता. सदर योजनेच्या सर्वेक्षण-अन्वेषण तसेच प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी लागणा-या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

नार,पार, औरंगा,अंबिका खो-यातील उपसा जोड योजनेचे सविस्तर सर्वेक्षण व अन्वेषण करुन प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठीच्या रु. ३, ६३, ३८,९०४/- (रु. तीन कोटी त्रेसष्ठ लाख अडतीस हजार नऊशे चार फक्त) किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

या प्रकल्पावर होणारा खर्च "४७०२- लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक व इतर क्षेत्रातील गुंतवणूका, (००) (०३) तापी पाटबंधारे विकास महामंडळाला भागभांडवली अंशदान (४७०२ ४९२७)" या लेखाशिर्षांतर्गत सर्वेक्षण-अन्वेषणासाठी अर्थसंकल्पित केल्या जाणाऱ्या ठोक तरतुदीतून करण्यात यावा. हा शासन निर्णय प्रशासकीय विभागास प्राप्त वित्तीय अधिकारात तसेच आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२२३१७२०२११९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pramod Govindrao Mandade

Digitally signed by Pramod Govindrao Mandade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pramod Govindrao Mandade
Date: 2014.12.23 18:02:22 +05'30'

**(प्र.गो.मांदाडे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री, (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव,
२) मा. राज्यमंत्री, (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव,
३) प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई,
६) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ,जळगाव,
७) मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक,
८) मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव,
९) आंतर वित्त, सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई,
११) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर,
१३) विभागीय आयुक्त (अनुदेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई/ नागपूर,
१४) जिल्हाधिकारी, नाशिक/ जळगांव,
१५) अधीक्षक अभियंता, नाशिक पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे,
१६) कार्यकारी अभियंता, उर्ध्व गोदावरी प्रकल्प विभाग, नाशिक,
१७) जसंअ कार्यासन संग्रहार्थ.